कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाला भागभांडवली अंशदान, ५४-गुंतवणूक खाली प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कोचिन-२०२३/प्र.क्र.०६/सां.का.१**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ मार्च, २०२३

वाचा : व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित यांचे क्र.कोचिन-२०२३, दि.०३.०३.२०२३.

**प्रस्तावना :**

कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाला भागभांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२०२ ०७८५) ५४-गुंतवणूक या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात रु.७.०० कोटी एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला असून, या तरतूदीतून वित्त विभागाने ७०% मर्यादेत रु.४.९० कोटी (रुपये चार कोटी नव्वद लक्ष फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणाली (BEAMS) वर उपलब्ध करुन दिला आहे. सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाला भागभांडवली अशंदानाकरिता वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात कोल्हापूर चित्रनगरीचा महामंडळाच्या पुनर्विकास प्रकल्पास भागभांडवली अंशदान म्हणून **रु.४.९० कोटी (रुपये चार कोटी नव्वद लक्ष फक्त)** इतक्या खर्चास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. शासनाने भांडवली कामासाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधीची गणना कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाच्या भांडवलातील शासनाच्या सहभागात करण्यात यावी.
२. महामंडळाला ज्या प्रयोजनार्थ निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे त्याच प्रयोजनावर निधीचा वापर करण्यात यावा. निधीचा वापर अन्य कोणत्याही प्रयोजनार्थ करण्यात येऊ नये.
३. शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीचे सनदी लेखापालांनी प्रमाणित केलेले विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र विहित मुदतीत सादर करण्यात यावे.
४. महामंडळाने केलेल्या खर्चाच्या विवरणाबरोबरच उपरोक्त कामांची प्रगती व भौतिक साध्य याची तपशिलवार माहिती संचालक मंडळाला वेळोवेळी अवगत करण्यात यावी व दर तीन महिन्यांनी विभागाला देखील अवगत करण्यात यावी.
५. सदरचा निधी खर्च करण्यापूर्वी संचालक मंडळाची मान्यता घेण्यात यावी.

२. यासाठी होणारा खर्च "क्र.झेड्डी-५, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च (००) (०२) कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाला भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२०२ ०७८५) ५४-गुंतवणुका" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

**३.** विचाराधीन खर्चासंदर्भात वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४ ऑक्टोबर, २०२१ सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मधील अट क्र.१,२,४ ची पूर्तता होत असून उर्वरीत सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटी या प्रकरणी लागू होत नाहीत.

**४.** हा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-५ मधील अ.क्र.०१ परिच्छेद क्र.१३४ नुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत केलेल्या तरतूदीनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०३२४१६०२२५४०२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2023.03.25 13:08:47 +05'30'

**( बाळासाहेब सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
३. उप सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित, कोल्हापूर.
५. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-१, महाराष्ट्र ,मुंबई
६. महालेखापाल ( लेखापरीक्षा )-१, महाराष्ट्र, मुंबई
७. वित्त विभाग (सा.उ. /व्यय-१५/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती (सां.का.१).